केंद्र शासनाच्या विचाराधीन असलेल्या
घटनादुरुस्तीच्या प्रस्तावाबाबत राज्य शासनाने
अभिप्राय/सहमती कळविण्याबाबत
घटनेच्या अनुच्छेद 243 व 171 मधील सुधारणा

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई – 400 032.
शासन निर्णय क्रमांक: पंरास 2010/प्र.क्र.79/पंरा-1
दिनांक :- 16 नोव्हेंबर, 2011.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणाच्या उद्देशाने अनुच्छेद 243 मध्ये घटना दुरुस्तीच्या माध्यमातून काही सुधारणा करण्याचे प्रस्ताविले आहे. संविधानामध्ये स्थानिक स्वराज्य संस्थांच्या माध्यमातून स्वयंशासनासाठी स्पष्ट तरतूद करुनही या संस्थाना अद्यापही समुचित अधिकार मिळालेले नाहीत. त्याचप्रमाणे स्थानिक स्वराज्य संस्थांना घटनेच्या तरतुदीनुसार कायदे बनविण्यासंबंधीच्या प्रक्रियेमध्ये सहभाग प्राप्त होणे गरजेचे आहे. तसेच स्थानिक स्वराज्य संस्थांचे गठन करणे आणि अशा संस्थाना स्वयंशासनाचे घटक म्हणून प्रभावीपणे काम करता यावे यासाठी त्यांना पुरेसे अधिकार देण्यासंबंधीची तरतूदही घटनेच्या अनुच्छेद 40 प्रमाणे जी दिशादर्शक तत्वे विहित केली आहेत त्यामध्ये अंतर्भूत आहेत. देशातील त्रिस्तरीय पंचायत राज व्यवस्थेला सन 2009 मध्ये 50 वर्षे पूर्ण झाली असून या टप्प्यावर संविधानातील काही तरतूदींचे पुनर्विलोकन करुन आवश्यक त्या दुरुस्त्या करणे गरजेचे आहे. त्यानुसार संविधानाच्या अनुच्छेद 243, 243 (जी) 243 (आय), 243 (ए), 243 (झेड) (डी) तसेच अनुच्छेद 171 मध्ये दुरुस्ती करण्याचे केंद्र शासनाने प्रस्तावित केले आहे व त्याबाबत राज्यांची मते मागविली आहेत. त्या अनुषंगाने विभागामार्फत सादर केलेल्या प्रस्तावावर मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयानुसार याप्रकरणी सविस्तर तपासणी करण्यासाठी मंत्रीमंडळ उप समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या पंचायतीराज विभागाने स्थानिक स्वराज्य संस्थांच्या बळकटीकरणाच्या उद्देशाने अनुच्छेद 243 मध्ये घटना दुरुस्तीच्या माध्यमातून काही सुधारणा करण्याचे प्रस्ताविले आहे. सदर घटना दुरुस्तीच्या तरतुदींचे व्यापक दूरगामी परिणाम पाहता या विषयावर सविस्तर तपासणी करुन मंत्रीमंडळाला अभिप्राय सादर

करण्यासाठी खालील प्रमाणे मंत्रीमंडळ उप समिती गठीत करण्यात येत आहे.

**मंत्रीमंडळ उप समिती**

1. मा. मंत्री (ग्राम विकास विभाग) अध्यक्ष
2. मा. मंत्री (जल संपदा विभाग)
3. मा. मंत्री (अन्न व नागरी पुरवठा विभाग)
4. मा. मंत्री (आदिवासी विभाग)
5. मा. मंत्री (सहकार विभाग)
6. मा. मंत्री (कृषि व पणन विभाग)
7. मा. मंत्री ( जलसंधारण व रोहयो विभाग)
8. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास विभाग)

मंत्रीमंडळाच्या आदेशानुसार वरील मंत्रीमंडळ उप समितीने आपला अहवाल लवकरात लवकर मंत्रीमंडळासमोर सादर करावा.

सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 201111117065409001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सुधीर ठाकरे
सचिव (पं.रा.)

प्रत माहितीसाठी रवाना:-
1) मा. राज्यपाल यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई-400 035.
2) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
3) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
4) उप समितीचे सर्व माननीय सदस्य.
5) माननीय मंत्री व राज्यमंत्री (सर्व) .
6) मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य (सर्व).
7) मुख्य सचिवांचे स्वीय सहायक.
8) निवड नस्ती, कार्यासन पंरा-1 ग्राम विकास व जलसंधारण विभाग.